**केंद्र पुरस्कृत बहुक्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) जिल्हाधिकारी कार्यालय, परभणी येथे स्थापित माहिती तंत्रज्ञान कक्षात (IT Cell) निव्वळ कंत्राटी पध्दतीवर नियुक्त एका संगणक चालकाचे मानधन अदा करण्याकरिता निधी वितरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बियुडी - २०१४/प्र.क्र. १५०/का.७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ डिसेंबर, २०१६.

<u>वाचा-</u>

१) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय, क्रमांक - बियुडी-२०१०/प्र.क्र.९०/का.७, दि.१८ ऑगस्ट, २०१०.
२) वित्त विभाग , शासन परिपत्रक, क्रमांक -अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/४/२०१६.
३) जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र. २०१६/अल्पसंख्याक /सामान्य/कावी-६७३, दि.०६/१०/२०१६.
४) जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र. २०१६/अल्पसंख्याक/ सामान्य/कावी-७३५, दि.०७/११/२०१६.
५) जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र. २०१६/अल्पसंख्याक/ सामान्य/कावी-८२७,दि-१७/१२/२०१६

<u>शासन निर्णय-</u>

संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत बहुक्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) राज्यातील परभणी, बुलढाणा, वाशिम व हिंगोली या ०४ अल्पसंख्याक बहुल जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी तसेच राज्याच्या मुख्यालयाच्या ठिकाणी म्हणजेच अल्पसंख्याक विकास विभागात माहिती तंत्रज्ञान कक्ष (IT Cell ) स्थापन करण्यासाठी रु.४.१० लाख या प्रमाणे ०५, IT Cell करिता एकूण रु.२०.५० लाख एवढी रक्कम संबंधित जिल्हाधिकारी तसेच अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय मुंबई यांना मंजूर करुन वितरीत करण्यात आली आहे. परभणी जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी स्थापन करण्यात आलेल्या IT Cell मध्ये निव्वळ कंत्राटी तत्वावर नियुक्त एका संगणक चालकाचे एकूण ०३ वर्षाच्या कालावधीचे मानधन अदा करण्यासाठी रु.२,८८,०००/- (रुपये दोन लाख अठ्ठयाऐंशी हजार फक्त) एवढी रक्कम उपलब्ध करुन देण्याची जिल्हाधिकारी, परभणी यांनी संदर्भ क्रमांक (३) , (४) व (५) येथील पत्राव्दारे विनंती केली आहे.

२. यासंदर्भात संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार परभणी जिल्हा मुख्यालयातील IT Cell मध्ये दि.२९.११.२०१४ रोजीच्या आदेशाव्दारे निव्वळ कंत्राटी तत्वावर नियुक्त एका संगणक चालकाचे एकूण ०३ वर्षाच्या कालावधीचे मानधन अदा करण्यासाठी प्रतिमाह रु.८,०००/- प्रमाणे एकूण रु.२,८८,०००/- ( दोन लाख अठठयाऐंशी हजार फक्त)एवढी रक्कम जिल्हाधिकारी, परभणी यांना मंजूर करुन वितरीत करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

३. जिल्हाधिकारी, परभणी यांना सन २०१६-१७ करिता वरीलप्रमाणे एकूण रु. २,८८,०००/- (दोन लाख अठठयाऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

४. सदर रक्कम जिल्हाधिकारी, परभणी यांचेकडे सूपुर्द करण्यात येत असून याकरिता ते “नियंत्रक अधिकारी” आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून काम पाहतील.

५. जिल्हाधिकारी, परभणी यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे तसेच अतिप्रदान व अखर्चित निधी परतावा शासनास भरणा (जमा) करण्याबाबत वित्त विभागाच्या दिनांक २० एप्रिल, २०१६ रोजीच्या परिपत्रकातील सूचनानुसार कार्यवाही करावी,

तसेच यापूर्वीचे उपयोगिता प्रमाणपत्र व महालेखापाल यांच्याशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय पुढील निधी वितरीत करण्यात येऊ नये.

६. जिल्हाधिकारी, परभणी यांनी सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वानुसार/CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी, सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा, तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

७. सदरचा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१) (१४) अल्पसंख्यांक बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (२२३५ ए २३१), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) " या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८. याप्रकरणी संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयातील अन्य अटी व शर्ती जशाच्या तशा लागू राहतील.

९. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.२०.४.२०१६ ला अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२८१५४४४७२३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MINORITY DEVELOPMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bcd09896471a6f90b80581ca42d45e27f07ad7e99a45bec3a7579cf10330fcd, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2016.12.28 15:47:23 +05'30'

( अशोक गायकवाड )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा ), मुंबई/नागपूर
३) जिल्हाधिकारी, परभणी
४) जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
५) उप सचिव, (का-७) अ.वि.वि. मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, अ.वि.वि. यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७) वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय -४) मंत्रालय, मुंबई
८) नियोजन विभाग (कार्या.१४७५)
९) निवड नस्ती, का.७.